जलसंपदा विभागांतर्गत गुणनियंत्रण व साहित्य चाचणी या कार्यक्षेत्रासाठी “Online Quality Control & Material testing” ही नवीन संगणक प्रणाली विकसित करण्यासाठी समिती स्थापन करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक : गुनिमं-२०१७/२७५/प्र.क्र.१०१/निवसं-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. २९ ऑगस्ट, २०१८.

**वाचा** :- १. शासन पत्र. क्र.गुनिमं-२०१७/२७५/प्र.क्र.१०१/निवसं-३ दि.१५/११/२०१७
२. प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या आठव्या बैठकीचे दि.२४/२/२०१८ रोजी निर्गमित केलेले इतिवृत्त.

जलसंपदा विभागांतर्गत मोठ्या / मध्यम / लघु पाटबंधारे प्रकल्प व जलविद्युत प्रकल्पांची विविध कामे प्रगतीपथावर असून या कामांवर जागतिक बँक, प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजना, नाबार्ड, राज्य शासन आणि टंचाई निधी अशा अनेक महत्वाच्या स्त्रोतातून निधी उपलब्ध होत असतो. अशा प्रकल्पांतील विविध घटकांची कामे निर्धारीत वेळेत, आवश्यक गुणवत्तेत व दर्जेदाररित्या पूर्ण करुन त्याच्या प्रकल्पीय आयुष्यमानापर्यंत कार्यक्षम व सुस्थितीत राखण्याची जबाबदारी जलसंपदा विभागांतर्गत येते. या अनुषंगाने प्रकल्पाच्या अशा सर्व घटक कामांचे प्रत्यक्ष बांधकाम आवश्यक गुणवत्तेत, प्रचलित मानकांनुसार व विनिर्दिष्टांनुसार करुन घेणेकरीता कार्यस्थळी कामाचे गुणनियंत्रण व वापरण्यात येणा-या बांधकाम साहित्यांची चाचणी अचूक व पारदर्शक पद्धतीने होणे अत्यंत आवश्यक आहे.

सद्यस्थितीत सदर गुणनियंत्रण बाबतची कार्यवाही ऑफलाईन पध्दतीने होत आहे. जलसंपदा विभागातील प्रकल्प बांधकाम तसेच गुणनियंत्रण विभागातील कामकाजात गतिमानता सुसूत्रता व पारदर्शकता आणण्याकरिता “Online Quality control & Material testing” ही संगणकीय प्रणाली विकसित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. सदर प्रणालीच्या माध्यमातून खालील कार्यवाही होणे अपेक्षित आहे.

१. Preparation of Annual construction programme
२. Issue of OK card
३. Issue of Inspection Notes
४. Issue of Inspection slips
५. Material Testing

"Online Quality control & Material testing" ही संगणकीय प्रणाली विकसित करण्यासाठी व सदर प्रणालीचा वापर सुयोग्य पध्दतीने होण्यासाठी सर्व संबंधितांना प्रशिक्षित करण्याच्या कामावर नियंत्रण ठेवण्यासाठी "सनियंत्रण समिती" खालील प्रमाणे गठित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

**अ) समितीची रचना :**

जलसंपदा विभागासाठी ऑनलाईन **"Quality Control and Material Testing"**प्रणाली विकसित करण्यासाठी **"सनियंत्रण समिती "** गठीत करण्यात येत आहे. या समितीची रचना पुढील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | श्री. दिलीप तवार, मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक लाभक्षेत्र विकास जलसंपदा विभाग, औरंगाबाद | अध्यक्ष |
| २. | श्री. विजय थोरात, अधीक्षक अभियंता गुणनियंत्रण,पुणे | सदस्य |
| ३. | श्री. इलियास चिस्ती, अधीक्षक अभियंता, गुणनियंत्रण मंडळ,औरंगाबाद | सदस्य |
| ४. | श्री.र. वि. जलतारे, अधीक्षक अभियंता गुणनियंत्रण मंडळ, नागपूर | सदस्य |
| ५. | श्री. प्रसाद नार्वेकर, अधीक्षक अभियंता गोसीखुर्द उपसा सिंचन मंडळ,भंडारा (अंबाडी) | सदस्य |
| ६. | श्री. श. द. भगत, अधीक्षक अभियंता मेरी, नाशिक | सदस्य |
| ७. | श्री. प्रविण कोल्हे, अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे | सदस्य |
| ८. | श्री. हनुमंत धुमाळ, अधीक्षक अभियंता, कुकडी सिंचन मंडळ, पुणे | सदस्य |
| ९. | श्री. प्रविण कोल्हे, अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई | सदस्य |
| १०. | श्री. सुनिल प्रदक्षिणे, कार्यकारी अभियंता, भामा आसखेड प्रकल्प विभाग, पुणे | सदस्य |
| ११. | श्री. ज. आ. मगर, कार्यकारी अभियंता बांधकाम व्यवस्थापन संगणकीकरण विभाग, पुणे | सदस्य सचिव |

**ब)समितीची कार्यकक्षा:**

१. गुणनियंत्रण संबंधित प्रचलीत कार्यपध्दतीचा जशाच्या तशा वापर न करता संगणकीकरणाचे परिमाणकारक व कार्यक्षमरीत्या वापर होणाच्या दृष्टीकोनातून, प्रणाली विकसित करताना प्रचलित शासन प्रक्रियेमधील काही बदल करावयाचे असल्यास त्या अनुषंगाने Government Process Re-engineering करून आवश्यक त्या शिफारस करणे व त्यानुसार प्रणालीचे विकसन करणे.

२) सद्यस्थितीत प्रणाली विकसित करण्यासाठी सर्व संबंधितांशी चर्चा करून प्रणालीच्या Requirement Gathering Templates (RGT), Software Requirement Specifications (SRS) यांना मान्यता देणे.

३) प्रणालीसाठी Module निहाय आवश्यक Master Data Dictionary तयार करण्यास सहाय्य करणे.

४) सदर प्रणालीच्या User Acceptance testing व स्विकृतीच्या (operational / final acceptance) टप्प्यावर तयार झालेल्या document ला मान्यता देणे.

५) मान्यताप्राप्त RGT/SRS मधील कामाच्या व्याप्ती मध्ये बदल करणे किंवा नविन मागणी प्राप्त झाल्यास गरजेप्रमाणे त्याची आवश्यकता तसेच त्याची व्यवहार्यता तपासून त्याबाबत मार्गदर्शन करणे व आवश्यक प्रणाली विकसित करून घेणे.

६) प्रशिक्षणाकरीता आवश्यक असलेले साहित्य व प्रशिक्षणाची पध्दत अमंलात आणणेसाठी मंजूर करणे, User Manuals ची तपासणी करून ते अंतिम करून देणे.

**क) समितीची कार्यपध्दती व बैठका:-**

समितीचे अध्यक्ष यांचे निर्देशानुसार समितीची कार्यपध्दत निश्चित करण्यात यावी. तसेच समितीच्या बैठका अध्यक्षांच्या सुचनेनुसार आयोजित केल्या जाव्यात. समितीच्या बैठकांना जलसंपदा विभाग तसेच इतर विभागाच्या अधिकाऱ्यांना व खाजगी व्यक्तिंना उपस्थित राहण्यासाठी निमंत्रित करता येईल. समितीच्या बैठकीच्या कामकाजासाठी गणपुर्तीची अट असणार नाही. समितीच्या अध्यक्षांनी समितीने निश्चित केलेल्या कालमर्यादेनुसार कार्यवाही होत असल्याबाबत खातरजमा करावी.

**ड) समितीचा कार्यकाळ :-**

सदर समितीचा कार्यकाळ प्रणालीची अंमलबजावणी झाल्यानंतर ६ महिनेपर्यंतचा राहील.

सदर शासन निर्णय जलसंपदा विभागाचे अधिकृत संकेतस्थळ https:// wrd. maharashtra. gov.in तसेच महाराष्ट्र शासनाचे संकेतस्थळ www.maharashtra.gov.in येथे उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८२९१२५८५०९९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करुन काढण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=544e07f06fbab100dc2bfe33db79fc14350d78d6c16f8feab484d842c496717d, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2018.08.29 13:00:59 +05'30'

**(डॉ.संजय बेलसरे)**
शासनाचे उपसचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री, जलसंपदा , महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.

२. मा.राज्यमंत्री, जलसंपदा , महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.

३. प्रधान सचिव (जसं ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
४. प्रधान सचिव (मा.तं), माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
५. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
६. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्विय सहाय्यक.
७. सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग.
८. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
९. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
११.सर्व अधीक्षक अभियंता व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.